**समर्पित अनुदानाचा स्वीकार**

**ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारक उपाययोजनांसाठी अनुदान- आर्थिक वर्ष २००९-२०१०. "मागणी क्र.सी -६-२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य- योजनेतर"**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक- टंचाई-१००९/प्र.क्र.५०/ पापु-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २८ जुलै , २००९**

**संदर्भ :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय-०५ /२००९/प्र.क्र.३६ /म-११ दि. २ मे,२००९, दि.१२ मे,२००९, दि.२५ मे,२००९
२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.टंचाई १००९/प्र.क्र.५०/पापु १४ दि.२ मे २००९, दि.१३ मे,२००९, दि.२८ मे,२००९
३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. टंचाई १००९/प्र.क्र.४९/पापु १४ दि.२ मे २००९, दि.२८ मे,२००९
४. जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र.साशा/कार्या-१/ब-११/अनुदान/२००९ दि.२७ जुलै,२००९

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व नागरी भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष "२२४५-नैसगिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशिर्षाखाली, महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात पाणी टंचाई निवारणार्थ घेतलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी महसूल व वन विभागाने लेखाशीर्ष २२४५००९३ (योजनेतर) अंतर्गत संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे रु.६७००.०० लक्ष अनुदान वर्ग केले आहेत. सदर अनुदानाचे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण टंचाई निवारण कार्यक्रमासाठी रु.६४८९.५४ लक्ष तर संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये नागरी टंचाई निवारण कार्यक्रमासाठी रु.२१०.४६ लक्ष या प्रमाणे संबंधित जिल्हाधिकारी यांना वाटप करण्यात आलेले आहे.

सन २००९-१० या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष २२४५००९३ (योजनेतर ) अंतर्गत संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी जिल्हाधिकारी, रायगड यांना रु. ४२०.८० लक्ष अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले होते. सदर अनुदानापैकी रु.२३५.३५ लक्ष अनुदान संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये जिल्हाधिकारी रायगड यांनी शासनास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे समर्पित केले आहेत. सदर समर्पण स्वीकारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २००९-१० या आर्थिक वर्षात ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या उपाययोजनावरील खर्च भागविण्यासाठी " सी-६ लेखाशिर्ष-२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१- अवर्षण -१०२- पिण्याच्या पाण्याचा पुरवठा - १०२ (००) (०१) निकडीच्या पाणी पुरवठा योजना (२२४५००९३) (दत्तमत) (योजनेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानापैकी **जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनास सर्मपित केलेले रु.२३५.३५ लक्ष (रुपये दोन कोटी पस्तीस लक्ष पस्तीस हजार फक्त ) अनुदान स्वीकारण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७२८१५३८५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(ज.बा.कुलकर्णी )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. प्रधान सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव,वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. जिल्हाधिकारी, रायगड
५. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी, रायगड
६. मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद , रायगड
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष,नविन प्रशासकिय भवन,५ वा मजला,मुंबई-४०० ०३२.(०२ प्रतींसह)
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई-४०० ०२१.
११. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोंकण भवन,नवी मुंबई.
१२. उपमुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा (सर्व)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१,मुंबई (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१५. कक्ष अधिकारी, व्यय-३ व व्यय-९, अर्थसंकल्प-३ व अर्थसंकल्प-४, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. कक्ष अधिकारी,म-७/म-११/ब-१/पिएसी/पिएसी-१, महसुल व वन विभाग , मंत्रालय,मुंबई.
१७. संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, पापु-१४.